ग्रामीण रुग्णालय , चौक ता. खालापुर जि. रायगड येथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे वावर्ले ता. खालापुर जि. रायगड येथे स्थलांतरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्राआकें २०१५/ प्रक्र-२०८/आरोग्य ३(अ)

गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला, ए विंग
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: १० नोव्हेंबर,२०१५.

**वाचा :-**

१) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र संआसे /कक्ष-७अ/ टे-७/ ग्रारुचौताखावास्थ/ न. क्र. ४४/१५, दिनांक- २५ मार्च २०१५.

**प्रस्तावना :-**

रायगड जिल्हयातील मौजे चौक येथे ग्रामीण रुग्णालय व प्राथमिक आरोग्य केंद्र या दोन्ही संस्था एकत्रितरित्या कार्यरत आहेत. त्यामुळे ग्रामीण रुग्णालय चौक येथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे वावंढळ या ठिकाणी स्थलांतरीत करण्याचा निर्णय घेण्यात आला होता . परंतु वावंढळ येथे जागा उपलब्ध होत नसल्याने तेथे प्राथमिक आरोग्य केंद्र स्थलांतरीत करणे शक्य झाले नाही. त्यामुळे सदरचे प्राथमिक आरोग्य केंद्र आता मौजे वावर्ले ता. खालापुर जि. रायगड येथे स्थलांतरीत करण्याचा प्रस्ताव आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भाधीन पत्रान्वये सादर केला आहे . त्यास अनुसरुन ग्रामीण रुग्णालय, चौक येथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे वावर्ले ता. खालापुर जि. रायगड येथे स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

आता या शासन निर्णयान्वये ग्रामीण रुग्णालय, चौक ता. खालापुर जि. रायगड येथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे वावर्ले ता. खालापुर जि. रायगड येथे स्थलांतरीत करण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) स्थलांतरीत ठिकाणी प्राथमिक आरोग्य केंद्र कार्यान्वित होवु शकेल याकरीता संबधित ग्रामपंचायतीने मोफत जागा देणे अनिवार्य असेल.

२) स्थलांतरीत ठिकाणी प्राथमिक आरोग्य केंद्र कायान्वित होवु शकेल अशी इमारतीची तात्पुरती व्यवस्था व कर्मचारी निवासाची व्यवस्था असणे आवश्यक राहील . ज्यायोगे या जागेत बाहयरुग्ण सेवा, स्त्री रुग्ण तपासणीसाठी स्वतंत्र व्यवस्था , प्रसूतीसाठी व्यवस्था,

कर्मचारी बसण्याची व्यवस्था रुग्णवाहिका असल्यास पार्कींग होणे अनिवार्य राहील . याबाबत जिल्हा नियोजन व विकास मंडळाने त्यांच्या जिल्हा योजनेतून तरतूद करणे आवश्यक आहे.

३) सदर इमारतीमध्ये पाणी, वीज इत्यादीची व्यवस्था असणे आवश्यक आहे..

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५१११०१०३७४१८३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shubha Anil Gadre

Digitally signed by Shubha Anil Gadre
DN: CN = Shubha Anil Gadre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.11.10 11:26:19 +05'30'

**शु.अ.गद्रे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. संचालक , आरोग्य सेवा, मुंबई.
२. जिल्हाधीकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, रायगड.
३. सह संचालक आरोग्य सेवा (प्राआके - जिपस्तर) मुंबई
४. उपसंचालक आरोग्य सेवा, मुंबई मंडळ , ठाणे .
५. मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद , रायगड
६. जिल्हा शल्य चिकीत्सक, रायगड.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी , रायगड
८. जिल्हा कोषागार अधिकारी , रायगड.
९. महालेखापाल १/२ महाराष्ट्र (लेखा व लेखापरिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपुर.
१०.निवड नस्ती